जिल्हा व सत्र न्यायालय अकोला आणि त्यांचे नियंत्रणाखालील तालुका न्यायालयीन इमारती व न्यायाधिश निवासस्थाने या इमारतींचा विमा उतरविण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत .......................

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१९/ प्र.क्र.२४०/का.१२,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ३१ जानेवारी, २०२२.

वाचा -

१ प्रबंधक (निरीक्षणे २), मा.उच्च न्यायालय, अपील शाखा मुंबई यांचे पत्र क्रमांक बी (डब्ल्यू) ६०४८ of २०१५ (१२९ SUM)/२६४३, दिनांक १० डिसेंबर, २०१९.
२ प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, जिल्हा व सत्र न्यायालय अकोला यांचे पत्र क्रमांक Bldg./५८७२/२०१९, दिनांक २१ नोव्हेंबर, २०१९
३ शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक एआयएफ १९७०/एमआयएससी/२१, दिनांक ०५ मे, १९७०
४ शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक अर्थसं २०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१

प्रस्तावना -

वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक ०५.०५.१९७० अन्वये सर्व शासकीय विभाग, निमशासकीय जिल्हा परिषद व महापालिका, महामंडळे, सरकारी कारखाने इ. ज्या संस्थांमध्ये शासनाचे प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष नियंत्रण / हितसंबंध गुंतलेले आहेत, अशा सर्व संस्थांना त्यांच्या मालकीच्या इमारतींचा विमा शासकीय विमा निधीकडे उतरवावा लागतो. या अनुषंगाने जिल्हा व सत्र न्यायालय अकोला यांनी जिल्हा व सत्र न्यायालय अकोला आणि नियंत्रणाखालील न्यायालयीन इमारती तसेच, न्यायाधिश निवासस्थाने यांचा विमा उतरण्यासाठी मसलमत्तेची घसारा किंमत एकूण विमा जोखीम रक्कम रुपये १३,६४,३७,९९३/- (रुपये तेरा कोटी चौसष्ट लक्ष सदतीस हजार नऊशे त्र्याण्णव फक्त) इतक्या रकमेसाठी तात्पुरता वार्षिक विमा हप्ता भरण्यासाठी दहशतवाद विमा जोखीम सहित रुपये ९६,६६७/- (रुपये शहाण्णव हजार सहाशे सदुसष्ट फक्त) इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती दिनांक २१ नोव्हेंबर, २०१९ रोजीच्या पत्रान्वये मा.उच्च न्यायालय मुंबई यांचेमार्फत केली आहे. त्या अनुषंगाने जिल्हा व सत्र न्यायालय अकोला व त्यांचे नियंत्रणाखालील न्यायालयीन इमारती आणि न्यायाधिश निवासस्थाने यांचा विमा उतरविण्यास शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

जिल्हा व सत्र न्यायालय अकोला आणि त्यांचे नियंत्रणाखालील तालुका न्यायालये, तसेच, न्यायाधिश निवासस्थाने यांचा विमा उतरविणेसाठी तात्पुरता वार्षिक विमा हप्ता भरण्यासाठी दहशतवाद विमा जोखीमसहीत प्रतिवर्ष रुपये ९६,६६७/- (रुपये शहाण्णव हजार सहाशे सदुसष्ट फक्त) इतक्या रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी होणारा खर्च संबंधित आर्थिक वर्षात निधिची तरतुद करुन "मागणी क्रमांक जे १, २०१४- न्यायदान (००) (१०५) दिवाणी व सत्र न्यायालये (०२) जिल्हा व सत्र न्यायाधिश (०२)(०१) जिल्हा व सत्र न्यायाधिश (२०१४ ०१७२) दत्तमत, १३ कार्यालयीन खर्च" या लेखाशीर्षामधून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय शासन निर्णय वित्त विभाग दिनांक १७.०४.२०१५ वित्तिय अधिकार नियमपुस्तिका भाग पहिला उप विभाग ३, अ.क्र. ४, परि.२७(२) (अ) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांन्वये तसेच, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १२१४/ २०२१/ व्यय-५, दिनांक ०६ जानेवारी, २०२२ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यत येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१३११५३२३०१२१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BHAGYASHREE
RAJENDRA
BHAIDKAR

Digitally signed by BHAGYASHREE RAJENDRA BHAIDKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d567849462918ceb7579bb2b56247e927c039bbdf028022a8b9ce837a7c854bb, serialNumber=fb84fefefe4ee219c1bc35b35201c14eab0903e8194a7413a74eed93f32afdb0, cn=BHAGYASHREE RAJENDRA BHAIDKAR
Date: 2022.01.31 15:33:48 +05'30'

**( भाग्यश्री भाईडकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई,
४. मा.सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,

५. मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
६. मा.महाप्रबंधक, उच्च न्यायालय मुंबई,
७. सर्व अ.मु.स. / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. सदस्य सचिव, विधि सेवा प्राधिकरण, मुंबई,
९. संचालक, अभियोग संचालनालय, मुंबई,
१०.प्रबंधक, मा.उच्च न्यायालय मुंबई, नागपूर, औरंगाबाद व पणजी खंडपीठ,
११.सर्व प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, जिल्हा व सत्र न्यायालये,
१२.महालेखापाल १, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई,
१३.महालेखापाल २, (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) नागपूर,
१४.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१५.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१६.जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला,
१७.उप जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला,
१८. वित्त विभाग, व्यय ५ / आ.पु.क. मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१९.विधि व न्याय विभागातील सर्व कार्यासने
२०.निवडनस्ती (का.१२)